महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ खाली शासकीय कर्मचाऱ्यांच्या (औद्योगिकेतर) शासन मान्यता प्राप्त संघटनांच्या नियम/ घटनादुरुस्ती करण्याकरिता अनुसरावयाची कार्यपध्दती..

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संघटना १५१५/प्र.क्र.१३८/१६-अ.**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१ जुलै, २०१५

<u>प्रस्तावना</u> : -

शासकीय कर्मचाऱ्यांच्या (औद्योगिकेतर) संघटनांना महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ च्या नियम २९, नियम ३० व सदर नियमावलीच्या परिशिष्ट, अनुसूची एक व अनुसूची दोन मध्ये विहित केलेल्या अटी व शर्ती तसेच "नवीन आदर्श नियम" ची घटना व नियमांच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येते. (अशा मान्यता प्राप्त संघटनांना यापुढे "संघटना" असे संबोधित केले आहे.)

२. संघटनेने, तिचे नाव, कार्यालयीन पत्ता, पदाधिका-यांची नावे, त्यांचे पत्ते या मधील सर्व बदल आणि संघटना नियमांमधील बदल वेळोवेळी कळविले पाहिजेत आणि शासनाला आवश्यक असेल अशी इतर माहिती सादर केली पाहिजे असे सदर परिशिष्टातील शर्त क्रमांक ५ येथे स्पष्ट करण्यांत आले आहे.

३. शासन मान्यताप्राप्त संघटनांना मान्यता प्रदान करतांना विहित घटना/नियमाच्या अधीन राहून संघटनांचे कामकाज करण्यास मान्यता देण्यांत येते. अशा संघटनांना शासन मान्य घटनेमध्ये आवश्यकतेनुसार बदल/ सुधारणा करण्याची मुभा, सदर परिशिष्टातील "शासकीय कर्मचा-यांच्या संघटनेला मान्यता देण्याकरीता शर्ती." मधील शर्त क्र. २ (ब) (चार) तसेच अनुसूची २- "नवीन आदर्श नियम" मधील नियम २८- "नियमांमध्ये दुरुस्ती करणे", या तदतूदीनुसार अनुज्ञेय आहे.

परिशिष्टातील शर्त क्र.२ (ब) (चार) येथील तरतुद खालील प्रमाणे आहे-

"संघटना नियमांमध्ये सुधारणा करण्यासंबंधीचे सर्व प्रस्ताव, त्याच्यावर ज्या बैठकीत विचार व्हावयाचा असेल, त्या संघटनेच्या बैठकीपूर्वी तीन कॅलेंडर महिने अगोदर कळविले पाहिजेत. संघटनेने अशी सुधारणा संमत केल्याच्या दिनांकापासून तीन कॅलेंडर महिन्यांच्या आत शासनाने सुधारणेला मान्यता दिल्याखेरीज अशी सुधारणा विधिसंमत ठरणार नाही व अंमलात येणार नाही."

तसेच अनुसूची २- "नवीन आदर्श नियम" मधील नियम २८ नुसार नियमांमध्ये दुरुस्ती करण्याबाबतची तरतुद खालीलप्रमाणे आहे-

"शासनाच्या मान्यतेच्या अधीन राहुन, सर्वसाधारण सभेमध्ये सदस्यांच्या बहुमताने कोणत्याही वेळी नियमामध्ये दुरुस्ती करता येईल, बदल करता येईल, पूर्वीच्या नियमांऐवजी दुसरे नियम करता येतील. नियम रद्द करता येतील किंवा त्यामध्ये भर घालता येईल. परंतु, प्रस्तावित बदलांबाबत सदस्यांना ७ दिवस अगोदर सूचना देण्यात आली पाहिजे."

४. तथापि, असे दिसून आले आहे की, शासन मान्यता प्राप्त असलेल्या संघटनांकडून, त्यांच्या घटना व नियमांमध्ये सुधारणा किंवा घटनादुरुस्ती करतेवेळी उपरोक्त विहित तरतुदींचे योग्य प्रकारे पालन करण्यात येत नाही.

५. त्यामुळे सध्या कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचारी (औद्योगिकेतर) यांच्या शासन मान्यताप्राप्त संघटनांनी प्रचलित तरतुदीनुसार घटना व नियमांमध्ये सुधारणा किंवा घटनादुरुस्ती करतांना शासन मान्य घटना व नियम तसेच नियमावलीतील प्रचलित अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घेण्याबाबत त्यांना सूचित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार आता खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत-

## शासन परिपत्रक :-

शासन मान्यताप्राप्त शासकीय कर्मचारी (औद्योगिकेतर) यांच्या संघटनांना आपल्या शासन मान्य घटनेच्या नियमांमध्ये सुधारणा करावयाची असल्यास अशा प्रस्तावित सुधारणेबाबतचा प्रस्ताव त्याबाबतच्या कारणमिमांसेसह आपल्या कार्यालय प्रमुखामार्फत संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे पाठवावा.

१. संघटनेने आपल्या संघटनेच्या ज्या सर्वसाधारण सभेपुढे सदरचा प्रस्ताव सादर करावयाचा आहे, त्या सभेचा दिनांक प्रस्तावासोबत तीन महिने अगोदर कळविणे आवश्यक राहील.

२. संघटनेने सदर प्रस्ताव सर्वसाधारण सभेच्या निर्धारित दिनांकाच्या किमान तीन महिने अगोदर आपल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे पोहोचेल अशा प्रकारे आपल्या कार्यालय प्रमुखामार्फत सादर करणे आवश्यक राहील.

३. संघटनेने आपल्या कार्यालय प्रमुखामार्फत संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे सादर केलेला नियम/घटनादुरुस्तीचा प्रस्ताव ज्या सर्वसाधारण सभेपुढे मांडण्यात येणार आहे त्या सर्वसाधारण सभेच्या निर्धारित दिनांकाच्या शक्यतो १५ दिवस अगोदर तथापि, किमान ७ दिवस अगोदर आपल्या सदस्यांना असा प्रस्ताव व त्याबाबतच्या कारणमिमांसेच्या प्रतीसह याबाबत सूचना देणे आवश्यक आहे.

४. संघटनेने प्रस्तावित केलेली नियम/घटनादुरुस्ती संघटनेच्या निर्धारित सर्वसाधारण सभेमध्ये सदस्यांच्या बहुमताने मान्य झाल्यानंतर याबाबतची माहिती,

सर्वसाधारण सभेच्या कार्यवृत्ताच्या प्रमाणित प्रतीसह आपल्या कार्यालय प्रमुखामार्फत संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे तात्काळ पाठवावी.

५. संघटनेच्या सर्वसाधारण सभेने ज्या दिनांकास नियम/घटनादुरुस्तीबाबतचा प्रस्ताव बहुमताने पारित केला असेल त्या दिनांकापासून कोणत्याही परिस्थितीत ७ दिवसात संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे याबाबतचा अहवाल प्राप्त होईल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संघटनेची राहील.

६. संघटनेने अशी सुधारणा संमत केल्याच्या दिनांकापासून तीन कॅलेंडर महिन्याच्या आत त्यास शासनाची मान्यता प्राप्त होणे आवश्यक आहे.

७. संघटनेच्या अशा सुधारणेस उपरोक्त विहित मुदतीत शासनाची मान्यता प्राप्त झाली नाही तर अशी सुधारणा विधी संमत ठरणार नाही व ती अंमलात आणता येणार नाही.

२. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुखांना सूचित करण्यात येते की, संघटनांकडून नियम/घटनादुरूस्तीबाबत उपरोक्त अ.क्र.१ ते ६ येथे विहित कार्यपध्दतीनुसार प्राप्त झालेला प्रस्ताव तात्काळ संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे पाठविण्याची त्यांनी दक्षता घ्यावी.

३. उपरोक्त परिच्छेद १ येथील अ.क्र. १ ते ६ येथे विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करुन संघटनेच्या सर्वसाधारण सभेसाठी निर्धारित दिनांकास सदर सभेमध्ये उपस्थित सदस्यांच्या बहुमताने मान्य झालेला नियम/घटनादुरुस्तीचा संघटनेचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्यानंतर संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग यांनी खालील प्रमाणे कार्यवाही करावी-

एक) संघटनेकडून नियम/ घटनादुरुस्तीबाबत प्राप्त झालेला प्रस्ताव विहित मुदतीत प्राप्त झाला आहे व उपरोक्त परिच्छेदामध्ये नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तींचे पूर्णत: पालन करणारा आहे याची प्रथम खातरजमा करावी.

दोन) संघटनेच्या प्रस्तावात त्रुटी आढळून आल्यास किंवा याबाबत विहित कार्यपध्दतीचा अवलंब न करता असा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला असेल तर तशा त्रुटींबाबत संघटनेस कळवून असा प्रस्ताव आपल्या स्तरावरुनच अमान्य करावा.

तीन) संघटनेकडून प्राप्त प्रस्तावाची संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडून छाननी करुन (टंकलेखनी चुका/त्रुटी, इत्यादी दुरुस्ती करुन) तद्नंतर संघटनेचा नियम/घटनादुरुस्तीबाबतचा प्रस्ताव नियमानुकूल असल्याची व त्यास शासनाची मान्यता अनुज्ञेय असल्याची मंत्रालयीन प्रशासकीय विभागाची खात्री झाल्यास, विभागाच्या तशा स्वयंस्पष्ट अभिप्रायासह आपल्या विभागाच्या मा. मंत्री महोदयांच्या, (जे विभाग मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अखत्यारीत असतील त्या

विभागांच्या बाबतीत त्यांचे मा.राज्यमंत्री महोदयांच्या) मान्यतेने संघटनेचा प्रस्ताव या विभागाकडे हस्तांतरीत करावा.

४. असा स्वयंस्पष्ट व परिपूर्ण प्रस्ताव संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडून प्राप्त झाल्यानंतर संघटनेच्या नियम/घटना दुरुस्तीच्या प्रस्तावांना शासनाची मान्यता देण्याबाबत नियमानुसार आवश्यक पुढील कार्यवाही या विभागामार्फत करण्यांत येईल.

५. नियम/घटनादुरुस्तीच्या प्रस्तावास मान्यता प्राप्त झाल्यानंतर संघटनेने संबंधित कार्यालय प्रमुखांना व शासनाच्या संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना सुधारित नविन नियम /घटनेच्या प्रत्येकी ५ प्रती सादर कराव्यात तसेच संघटनेच्या जुन्या घटना/ नियमाच्या ५ प्रती तसेच सुधारित/ नवीन नियम/घटना दुरुस्तीसह नवीन घटनेच्या ५० प्रती सामान्य प्रशासन विभागाकडे सादर कराव्यात.

६. हे परिपत्रक निर्गमित झाल्याच्या दिनांकास शासनाच्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे किंवा क्षेत्रिय कार्यालयाकडे महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ च्या नियम २९ व ३० खालील परिशिष्ट, अनुसूची एक व अनुसूची दोन खालील विहीत तरतूदीनुसार नियम/घटनादुरुस्तीचे शासकीय कर्मचारी (औद्योगिकेतर) यांच्या संघटनेकडून प्राप्त झालेल्या सर्व प्रस्तावांबाबत देखील या परिपत्रकातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१५०७२०१५४२५०२८०७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tikaram Waman Karpate

Digitally signed by Tikaram Waman Karpate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9395c596b57a69fe04109b8c8191e7389cff5eda3fac16c6f8263be7fbbd319d, cn=Tikaram Waman Karpate
Date: 2015.07.21 16:10:42 +05'30'

**(टि.वा.करपते)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
२) सर्व सन्माननीय विधान परिषद विधान/ सभा व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
३) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-३५.
४) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंब-३२.
५) सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
७) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.

८) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद), विधानभवन, मुंबई-३२.
९) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान सभा), विधानभवन, मुंबई-३२.
१०) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई- ३२.
११) सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई-३२.
१२) प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
१३) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
१४) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
१५) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई.
१६) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१७) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई.
१८) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर.
१९) सर्व मंत्रालयीन विभाग.
२०) सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी.
२१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ (५ प्रती).
**त्यांना विनंती की, प्रस्तुत शासन परिपत्रकास प्रसिध्दी देण्याबाबत आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.**
२२) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२३) मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख.
**(त्यांनी सदर परिपत्रक आपल्या कार्यालयाच्या सूचना फलकावर प्रसिध्दी करिता लावावे).**
२४) सर्व महानगरपालिकांचे आयुक्त.
२५) सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका/ नगरपरिषदा.
२६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२७) विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती).
२८) राज्यातील सर्व महामंडळे, मंडळे आणि सार्वजनिक उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक.
२९) सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये.
३०) निवड नस्ती/कार्यासन १६-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ (१५ प्रती).